आहे । वश नको होऊं तयासी. ॥ ९७० ॥ होऊनि [1]रजतमातीत । नित्य सत्त्वीं तूं निश्चित । राहसी तें[2] अनुभवामृत । जतन करीं अर्जुना! ॥ ९७१ ॥ शीतोष्ण मानापमान । सुखदुःख हें [3]द्वंद्व समान । पाहसी तरीच देहाभिमान । न [3]खवळे तुझा अर्जुना! ॥ ९७२ ॥ जोंवरी रज्जूची स्मृति । तोंवरी न दिसे सर्पाकृति । त्याची पडतां विस्मृति । भय सर्प करी तत्काळ. ॥ ९७३ ॥ प्रारब्धभोग देहा । जरी टाकिसी त्याच्या स्नेहा । परंतु भोग उपजवी हा । सुखी दुःखी मीपणा. ॥ ९७४ ॥ सुखी वाटेच मी सुखी । दुःखी वाटेच मी दुःखी । भोगसमयीं आणखी । न उपजे प्रत्यय. ॥ ९७५ ॥ त्या मीपणाची जाती । सुखी म्हणे हो हें मागुती । दुःखीं म्हणे हे दुःखप्राप्ती । कधीं न हो. ॥ ९७६ ॥ या चिंतेंत पडला । अनुभव त्याचा बिघडला । जाऊनि मागुती जोडला । दे[4]हभाव. ॥ ९७७ ॥ प्रारब्धाचा भोग । तो करीच सुखदुःखयोग । जोवरी होय वियोग । शरीराचा. ॥ ९७८ ॥ म्हणूनि यास उपाय । हाच की नि[5]र्द्वंद्व होय । की भोगूनि भोग नव जाय । अनुभव नित्यसत्त्वाचा. ॥ ९७९ ॥ बाळास लागे क्षुधा । रडे होतां दुःखबाधा । पितां मातेची [6]स्तनसुधा । हांसों लागे. ॥ ९८० ॥ मज नलगे ऐसी क्षुधा । हें न म्हणे होतां क्षुधेची बाधा । सदा मिळो हे स्तनसुधा । स्तन पितां हेही म्हणेना. ॥ ९८१ ॥ होऊनि गेला सुखभोग । न म्हणे पुन्हा तोचि हो योग । अथवा न हो रोग । जाला होता जो मला ॥ ९८२ ॥ अर्जुना! ऐसे परी । सुखदुःखें भोगिसी जरी । थारसी नित्यसत्त्वीं तरी । निर्द्वंद्व हो यालागीं ॥ ९८३ ॥ ऐसें बाळाचे परी । सुखदुःख भोगिसी जरी । अनुभव सर्वा अवसरीं । थारेल तुझा. ॥ ९८४ ॥ द्वंद्वी जालासि धीर । तरी आहे शरीर । त्याच्या रक्षणार्थ भार । झणीं वाहसी चिंतेचा. ॥ ९८५ ॥ जे जे काळीं जें जें । देहनिर्वाहास पाहिजे । तें मेळवाया न कीजे । यत्न कांहीं अर्जुना! ॥ ९८६ ॥ नाहीं तें मेळवावें । अगा! यास **'योग'** म्हणावे । मिळावें तें जतन करावें । **'क्षेम'** म्हणावे त्यालागीं. ॥ ९८७ ॥ दोन्हीं मिळोनि **'योगक्षेम'** । येविषयीं न करीं श्रम । कीं त्या श्रमें उपजे भ्रम । संपादितां अर्थ. ॥ ९८८ ॥ यत्नही केला नाहीं । आणि उगेंचि मिळालें कांहीं । जतन करावया तेंही । न करीं यत्न.

१. रजतमावेगळा. २. जोडपे. ३. उचबळत नाही. ४. देह हा आत्मा–असा भाव. ५. द्वंद्वरहित, रजतमा बेगळा. ६. स्तन हेंच अमृत.